**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत अंमलबजावणीकरिता अनुसूचित जमातीचा सन २०२१-२२ चा पहिल्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राशेअ-४४२२/प्र.क्र.४३/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २८ मार्च, २०२२

संदर्भ:-

१. केंद्र शासनाने www.agricoops.nic.inया सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सुचना.
२. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक ०४१८/प्र.क्र.१५५/१४ अे, दि. २७ एप्रिल, २०१८
३. शासन निर्णय क्रमांक शाशेअ ४४२१/प्र.क्र.८२/८ अे, दिनांक २९.७.२०२२
४. केंद्र शासनाचे पत्र क्र. १-२१/२०१८-RFS-III, दिनांक २४ फेब्रुवारी, २०२२
५. कृषि आयुक्तालयाचे क्र. कृआ-२०२१/कोक्षेवि/पहिला हप्ता/७६८३, दि. २५.२.२०२२
६. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र. बीयुडी २०२१/प्र.क्र. ७/कार्यासन-६ दि. २५.३.२०२२

प्रस्तावना-

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास [Rain fed Area Development (RAD)] योजनेची अंमलबजावणी करण्यात येत असून त्याकरिता केंद्र व राज्य हिश्श्याचे अनुदानाचे प्रमाण ६०:४० असे आहे.

राज्य शासनाच्या अर्थसंकल्पिय अदाजपत्रकामध्ये (White book) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) सन २०२१-२२ करीता रु. ३९४२.०० लाख रकमेची तरतूद करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये सन २०२१-२२ या वर्षासाठी केंद्र हिस्सा रु.१५९४.०७ लाख व राज्य हिस्सा रु.१०६७.१५ लाख अशा एकूण रु. २६६१.२२ लाख रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार अनुसूचित जमातीसाठी केंद्र हिस्सा रु. १६४.०० लाख व राज्य हिस्सा रु. ११०.०० लाख इतका आहे

केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ४ येथील दिनांक २४.२.२०२२ च्या पत्रान्वये राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) अंतर्गत कोरडवाहु क्षेत्र विकास (RAD) योजनेअंतर्गत अनुसूचित जमातीकरिता रु.३७.६० लाख निधी राज्य शासनाकडे वितरीत करण्यासाठी त्यांच्याकडील पे अँड अकाऊंटस ऑफिसर (सेक्टर) यांना कळविले आहे. त्यानुसार राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अंमलबजावणी करण्यासाठी अनुसूचित जमातीचा पहिल्या हप्त्याचा केंद्र हिश्श्यापोटी रु.३७.६० लाख व राज्य हिश्श्यापोटी रु. २५.०७ लाख अशा एकूण रु.६२.६७ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत (NMSA) कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ मध्ये अनुसूचित जमातीकरिता पहिल्या हप्त्याचा केंद्र हिश्श्याचा रु. ३७.६० लाख (रुपये सदतीस लाख साठ हजार फक्त) व पूरक राज्य हिश्श्याचा रु. २५.०७ लाख (रुपये पंचवीस लाख सात हजार फक्त) असा एकूण रु. ६२.६७ लाख (रुपये बासष्ट लाख सदुसष्ट हजार फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना पुढीलप्रमाणे वित्तीय व्यवस्थापन प्रणालीवर (बीडीएस) वितरीत करण्यात येत आहे.

२. **( रू. लाखात)**

| **प्रवर्ग** | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** | **एकूण** |
|---|---|---|---|
| अनुसूचित जमाती | ३७.६० | २५.०७ | ६२.६७ |

३. सदर रु. ६२.६७ लाख निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| | **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|---|
| **अनुसूचित जमाती** | **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवकिंग कार्यक्रम (केंपुयो) (केंद्र हिस्सा-६०%) (अनुसूचित जमाती) (२४०१ ए ५३९)<br>३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्र.टी-५,**<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना,<br>(०१)(२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती सनियंत्रण, प्रतीमानकरण व नेटवकिंग कार्यक्रम (केंपुयो) (राज्य हिस्सा-४०%) (अनुसूचित जमाती) (२४०१ ए ५४८)<br>३३ अर्थसहाय्य. |

४. या शासन निर्णयाव्दारे उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू. ६२.६७ लाख निधीचे सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने, निधी आहरण व संवितरण करण्यासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| स्तर | नियंत्रण अधिकारी | आहरण व संतिरण अधिकारी |
|---|---|---|
| आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |

५. केंद्रिय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रमासाठी राज्य शासनास सन २०२१-२२ करीता मंजूर केलेल्या कृति आराखड्यानुसार आणि वेळोवेळी केंद्रिय कृषि मंत्रालयाने दिलेल्या दिशानिर्देशानुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करणे बंधनकारक राहील. याबाबत संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी राज्यस्तरावरून अभियानाचे संनियंत्रण करावे, त्याचप्रमाणे अभियानाच्या प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाकरीता वेळोवेळी अधिनस्त कार्यालयांना निदेशित करावे.

६. सदर योजनेची अंमलबजावणी केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांमधील अवर्षण प्रवण क्षेत्र घटकाच्या मार्गदर्शक सूचनांनूसार तसेच संदर्भाधीन अ.क्र. २ येथील उन्नत शेती समृद्ध शेतकरी अभियानाच्या दिनांक २७ एप्रिल, २०१८ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार करण्यात यावी.

७. प्रत्येक महिन्याला योजनेची भौतिक आणि आर्थिक प्रगती याबाबतची माहिती अद्ययावत करण्यात यावी व राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांसोबतच्या परिशिष्ट-३ मध्ये भरण्यात यावी व सदरची माहिती राज्य शासनाकडेसुद्धा पाठविण्यात यावी.

८. योजनेचा सविस्तर त्रैमासिक प्रगती अहवाल पुढील त्रैमासिकाच्या पहिल्या महिन्यांच्या १० तारखेपर्यंत त्याचप्रमाणे वार्षिक प्रगती अहवाल आर्थिक वर्ष संपल्यानंतर ३ महिन्यांच्या कालावधीत कृषी व सहकार विभाग, कृषी मंत्रालय, भारत सरकार यांच्याकडे तसेच राज्य शासनाकडे पाठविण्यात यावा.

९. कोरडवाहू क्षेत्र विकास (RAD) कार्यक्रमाच्या उद्दिष्टपूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन अ.क्र. १ येथे नमुद केलेल्या केंद्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असलेल्या सदर घटकाच्या मार्गदर्शक सूचना तसेच उपरोक्त नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सुचना क्षेत्रिय अधिकाऱ्यांना निर्गमित कराव्यात.

१०. अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा निधी अनुसूचित जमाती लाभार्थ्यांकरीता खर्च करण्यात यावा.

११. अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना योजनेचा लाभ कोणत्या स्वरुपात देण्यात आला, याबाबतची सन २०१९-२० तसेच सन २०२०-२१ या वर्षातील माहिती आदिवासी विकास विभागास सादर करण्यासाठी, शासनास सादर करण्यात यावी.

१२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४. ऑक्टोबर, २०२२ व दिनांक ३ फेब्रुवारी २०२२ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकाराचा वापर करुन व सदर परिपत्रकातील अटी शर्तीची पूर्तता करुन तसेच संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील आदिवासी विकास विभागाच्या दिनांक २५ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२८१७५८०३५७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2022.03.28 18:05:36 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे

२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
७. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
८. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०. व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा अग्रणी बँक (बँक ऑफ महाराष्ट्र, लोकमंगल ,पुणे)
११. सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१४. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
१६. सहायक संचालक(लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे
१७. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
१८. उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
१९. उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२०. सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२१. वित्त विभाग (का. व्यय-१/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय,मुंबई
२२. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६), मंत्रालय, मुंबई
२३. निवडनस्ती ८-अे.